विद्युत निरीक्षणालयातील निलंबित अधिकाऱ्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. मुविनि-२०२२/प्र.क्र.२१/ऊर्जा-१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०२ मे, २०२२.

**संदर्भ:** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. आयएलई-२०१५/प्र. क्र. ८६/ प्रशासन-३, दि. ३०/०६/२०१५

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन आदेश क्र. मुविनि-२०१८/प्र.क्र. १६२/ऊर्जा-५, दि. १०/१०/२०१८.

३) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन आदेश क्र. मु.अ. (वि)/का-१/१३४१/२०११, दि. २७/०४/२०११.

४) निलंबन आढावा समितीचे इतिवृत्त दि.२३/०८/२०१९ व दि. २०/११/२०२०.

**प्रस्तावना:**

विद्युत निरीक्षणालयातील खालील विवरणपत्रात दर्शविलेल्या अधिकाऱ्याविरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने केलेल्या कारवाईच्या अनुषंगाने त्यांना संदर्भ क्र. २ ते ३ येथील आदेशान्वये निलंबत करण्यात आले आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | निलंबित केले ते कार्यालय | मूळ महसूली विभाग | निलंबन आदेशाचा दिनांक | निलंबनाचा दिनांक | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. रामकृष्ण सिताराम देवकर, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. २, ठाणे | पुणे | १०.०८.२०१८ | ०७.०७.२०१८ | मानीव निलंबन |
| २ | श्री. यशवंत बा. गावडे, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. १, ठाणे | पुणे | २७.०४.२०११ | १४.०४.२०११ | मानीव निलंबन |

ऊर्जा विभागाच्या अखत्यारीतील गट-अ व गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निलंबन आढावा समिती गठीत करण्यात आली आहे.

वरील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांच्या निलंबनाचा आढावा घेण्यासाठी निलंबन आढावा समितीची बैठक दि. २३/०८/२०१९ व दि. २०/११/२०२० रोजी संपन्न झाली. सदर बैठकीत समितीने घेतलेल्या निर्णयानुसार उपरोक्त अधिकाऱ्यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांना शासन सेवेत अकार्यकारी पदावर पुन:स्थापित करण्याची शिफारस केली आहे. निलंबन आढावा समितीच्या शिफारशीस अनुसरुन उपरोक्त विवरणपत्रातील अधिकाऱ्यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांची शासन सेवेत पुन:स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत:-

**शासन आदेश :**

निलंबन आढावा समितीने शिफारस केल्यानुसार व महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम ४ (५) (क) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करून, श्री. रामकृष्ण सिताराम देवकर, सहाय्यक विद्युत निरीक्षक (निलंबित) व श्री. यशवंत बा. गावडे, सहाय्यक विद्युत निरीक्षक (निलंबित) यांचे निलंबन संपूष्टात आणून त्यांच्याविरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशी व न्यायालयीन प्रकरणांमधील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या दि. २०/०४/२०१३ रोजीच्या परिपत्रकातील तरतुदीनुसार उक्त अधिकाऱ्यांची खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार पुन:स्थापनेने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | निलंबित केले ते कार्यालय | पुन:स्थापनेनंतर पदस्थापनेचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्री. रामकृष्ण सिताराम देवकर, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. २, ठाणे | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, मुंबई या कार्यालयातील कक्ष क्र. ५ या रिक्त पदावर |
| २ | श्री. यशवंत बा. गावडे, सहाय्यक विद्युत निरीक्षक | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग क्र. १, ठाणे | विद्युत निरीक्षक, निरीक्षण विभाग, सांताक्रुझ या कार्यालयातील कक्ष क्र. ०६ या रिक्त पदावर |

३. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांना याद्वारे सूचित करण्यात येते की, उपरोक्त अधिकाऱ्यांकडे पदस्थापनेनंतर अकार्यकारी स्वरूपाची कामे सोपविण्यात यावीत.

४. या आदेशान्वये शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व रुजू अहवाल मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत शासनास सादर करावा. सदर अधिकारी पदस्थापनेच्या कार्यालयात ज्या दिवशी रुजू होतील, त्या दिनांकापासून त्यांचे निलंबन संपूष्टात आल्याचे समजण्यात येईल.

५. तसेच सदर अधिकाऱ्यांचा निलंबन कालावधी नियमित करण्याबाबतचे आदेश, त्यांच्या विरुध्दच्या न्यायालयीन प्रकरणाचा व विभागीय चौकशीचा अंतिम निर्णय झाल्यानंतर यथावकाश काढण्यात येतील.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०५०२१५२३१७०३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीन साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्टाचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAM CHAUDHARI

Digitally signed by RAM CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSRTY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e44d5d15adae961af6d1ac849c24fa6be219c4e5a8accfa2ef8db48a9c886c40, pseudonym=8EDCBBC09460CD9488F7A18CC48C8B95B3908056, serialNumber=08959C5CFE10323630591C090854AAD890486067A7D6331EC64E373717E8D56D, cn=RAM CHAUDHARI
Date: 2022.05.02 15:24:51 +05'30'

**( राम सु. चौधरी )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. श्री. रामकृष्ण सिताराम देवकर, सहाय्यक विद्युत निरीक्षक
२. श्री. यशवंत बा. गावडे, सहाय्यक विद्युत निरीक्षक
द्वारा : मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबुर (पूर्व), मुंबई- ४०० ०७१.

**प्रत,**

१. मुख्य विद्युत निरिक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, तिसरा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबुर (पूर्व), मुंबई- ४०० ०७१.
२. अधिक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, मुंबई / पुणे/ औरंगाबाद/ नागपूर.
३. महालेखापाल -१ लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा, महाराष्ट्र, मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. सामान्य प्रशासन विभाग, कार्या -११ अ, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. निवडनस्ती ( ऊर्जा-१)